GR-200407071309111001-0100

शासन सेवेत सरळ सेवा भरतीसाठी समांतर आरक्षण (Horizontal Reservation) कार्यान्वित करण्यासाठी अनुसरावयाची कार्यपध्दती विहित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांक:एसआरव्ही-1097/प्र.क्र.31/98/16-अ,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक 16 मार्च, 1999.

वाचा: 1. शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र.एसआरव्ही-1077/3576/1433/16-अ, दि.23.5.1978.
2. शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र.एसईएम-1080/35/16-अ, दि.21.1.1980.
3. शासन परिपत्रक, सा.प्र.वि. क्र.आयपीई/आरटीए-1080/0/181/16-अ, दि.10.10.1980.
4. शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र.एसआरव्ही-1094/1004/प्र.क्र.30/16-अ, दि.17.11.1994.
5. शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र.बीसीसी-1094/प्र.क्र.68/94/16-ब, दि.12.8.1994.
6. शासन निर्णय, न.व.वि. क्र.ईक्यूआर-1094/प्र.क्र.768/भूपुक-1, दि.9.8.1995.
7. शासन निर्णय, म.व.बा.क.वि. क्र.संकीर्ण-1096/प्र.क्र.30/का.-2, दि.1.8.1997.
8. शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र.बीसीसी-1097/प्र.क्र.2/97/16-ब, दि.6.8.1997.
9. शासन परिपत्रक, सा.प्र.वि. क्र.एसआरव्ही-1097/प्र.क्र.12/97/16-अ, दि.2.5.1998.
10. अनिल कुमार गुप्ता वि. उत्तर प्रदेश राज्य आणि इतर (जेटी-1995(5)एससी-505) या प्रकरणी सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या न्याय निर्णयातील मार्गदर्शक तत्वे.

परिपत्रक :- शासनाने सेवेतील भरतीसाठी मागासवर्गीयांसाठी आरक्षण लागू केले आहे. हे आरक्षण सामाजिक आरक्षण (Social Reservation) असल्याने ते उभे आरक्षण (Vertical Reservation) आहे. त्याचप्रमाणे विशेष आरक्षण (Special Reservation) मागासवर्गीयांव्यतिरिक्त अन्य घटकांसाठी लागू केलेले आहे व ते समांतर किंवा आडवे आरक्षण (Horizontal Reservation) आहे. या संदर्भात मुंबई उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाने (अॅपलेट साईड) रिट याचिका क्रमांक:4067/1998 वरील निर्णयान्वये अनिलकुमार गुप्ता वि. उत्तर प्रदेश राज्य आणि इतर (जेटी-1995(5)एससी-505) या प्रकरणी सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या न्याय निर्णयास अनुसरुन समांतर आरक्षणाबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याचे आदेश दिले आहेत. त्यानुसार सेवेतील उभे आरक्षण व समांतर आरक्षणाच्या संदर्भात अनुसरावयाची कार्यपध्दती व त्या बाबतच्या मार्गदर्शक सूचना शासकीय/निमशासकीय सेवा, मंडळे/महामंडळे/नगरपालिका/महानगरपालिका/जिल्हापरिषदा/शासकीय अनुदान प्राप्त संस्था/विद्यापिठे/सहकारी संस्था व शासकीय उपक्रम इत्यादींना लागू करण्यात यावे.

2. सेवेतील नियुक्तीसाठी सामाजिक आरक्षण (उभे आरक्षण) खालीलप्रमाणे आहे :-

| | | |
|---|---|---|
| 1. अनुसूचित जाती | : | 13% |
| 2. अनुसूचित जमाती | : | 7% |
| 3. विमुक्त जाती (अ) | : | 3% |
| 4. भटक्या जमाती (ब) | : | 2.5% |
| 5. भटक्या जमाती (क) | : | 3.5% |
| 6. भटक्या जमाती (ड) | : | 2% |
| 7. विशेष मागास प्रवर्ग | : | 2% |
| 8. इतर मागास वर्ग | : | 19% |

वर नमूद केलल्या आरक्षणाव्यतिरिक्त सेवेतील नियुक्त्यांसाठी लागू असलेले विशेष आरक्षण (समांतर आरक्षण) पुढीलप्रमाणे आहे :-

| | |
|---|---|
| 1. माजी सैनिक | 15% फक्त गट क आणि गट ड साठी |
| 2. प्रकल्पग्रस्त/भूकंपग्रस्त | 5% फक्त गट क आणि गट ड साठी |
| 3. अपंग | 3% गट अ आणि ब मधील काही पदांसाठी तसेच गट क आणि गट ड साठी |
| 4. महिला | 30% |

समांतर आरक्षण हे फक्त सरळ सेवा भरतीस लागू राहील. समांतर आरक्षण हे सामाजिक आरक्षणांतर्गत आरक्षण असल्याने त्यास सामाजिक आरक्षणावर वाढीव म्हणून गणन्यात येऊ नये.

4. सर्वोच्च न्यायालयाच्या न्याय निर्णयात उल्लेखिलेल्या प्रमाणे समांतर आरक्षण हे कप्पीकृत आरक्षण ( Compartmentalised Reservation ) आहे, म्हणून पदे भरण्यापूर्वी, पदे निश्चित करताना तसेच भरतीची जाहिरात देताना त्या जाहिरातीत केवळ सामाजिक आरक्षणाची पदसंख्याच नमूद न करता सामाजिक आरक्षणाच्या प्रत्येक प्रवर्गामध्ये (उभे आरक्षण जसे अ.जा., अ.ज., वि.ज.(अ), भ.ज.(ब), भ.ज.(क), भ.ज.(ड) वि.मा.प्र., इ.मा.व. आणि खुला प्रवर्ग) विशेष आरक्षणानुसार येणा-या राखीव पदांची संख्या सुध्दा निर्देशित करावी.

5. सर्वोच्च न्यायालयाच्या न्याय निर्णयात/उल्लेखिलेल्या नुसार समांतर आरक्षणांतर्गत त्या त्या प्रवर्गासाठी विहित करण्यात आलेल्या टक्केवारीनुसार वाटा निश्चितपणे मिळावा यासाठी सरळसेवा भरती करताना खालील टप्पे विचारात घेण्यात यावेत :-

(अ) प्रथम टप्पा :- गुणवत्तेच्या निकषानुसार खुल्या प्रवर्गातील उमेदवारांची निवड यादी करावी, या यादीत, समांतर आरक्षणात बसणा-यांची संख्या पर्याप्त असेल तर कोणताही प्रश्न उद्‌भवणार नाही आणि त्यानुसार पदे भरावीत. जर समांतर आरक्षणाच्या प्रवर्गातील उमेदवारांची संख्या पर्याप्त नसेल तर समांतर आरक्षणाकरीता त्या त्या प्रवर्गातील उमेदवारांना उपलब्धतेनुसार पर्याप्त संख्येत यादीतील शेवटचे उमेदवार वगळून समाविष्ट करावेत.

(ब) दुसरा टप्पा :- त्यानंतर प्रत्येक सामाजिक आरक्षणाच्या प्रवर्गातील उमेदवारांच्या निवड याद्या तयार कराव्यात (जे उमेदवार यापूर्वीच टप्पा 'अ' मध्ये सामिल झाले असतील त्यांना या यादीतून वगळावे.)

(क) तिसरा टप्पा :- वरील 'ब' नुसार तयार करण्यात आलेल्या याद्यांमध्ये सामाजिक आरक्षणातील (Social Reservation ) प्रत्येक प्रवर्गाच्या विहित टक्केवारीनुसार 'अ' येथे विशद केलेल्या कार्यपध्दतीनुसार समांतर आरक्षणाचे पुरेसे उमेदवार समाविष्ट करावेत. मात्र असे करताना सामाजिक प्रवर्गांतर्गत राहावे.

6. सर्वोच्च न्यायालयाच्या न्याय निर्णयात उल्लेखिलेल्यानुसार विशेष आरक्षण हे प्रत्येक उभ्या आरक्षणाच्या कक्षांतर्गत राहील. म्हणजेच विशेष आरक्षण हे एका सामाजिक आरक्षण प्रवर्गातून दुस-या सामाजिक आरक्षण प्रवर्गात स्थानांतरीत करता येणार नाही.

7. सर्व नियुक्ती प्राधिका-यांनी वरील कार्यपध्दती तसेच सूचनांनुसार यापुढे न चुकता कार्यवाही करावी. हे आदेश शासकीय/निमशासकीय सेवा, मंडळे/महामंडळे/नगरपालिका/महानगरपालिका/जिल्हापरिषदा/शासकीय अनुदान प्राप्त संस्था/विद्यापिठे/सहकारी संस्था व शासकीय उपक्रम इत्यादींना लागू करण्यात यावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

भि.रा.वाढवे,
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्री यांचे सचिव,
उप मुख्य मंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव/अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मूळ शाखा, खंडपीठ, औरंगाबाद,
* प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, अपील शाखा, खंडपीठ, औरंगाबाद,
* प्रबंधक, लोकआयुक्त आणि उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई,
सचिव, सर्व प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळे,
संचालक, समाजकल्याण, पुणे,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभागप्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

---

* पत्राने.

एच-1445(5000-3-99)-अ.